**हंगाम २०१७-१८ मध्ये किमान आधारभूत किंमत योजनेंतर्गत NeML पोर्टलवर नोंदणी केलेल्या, परंतु ज्यांच्याकडून तूर/हरभरा खरेदी केलेली नाही, अशा शेतकऱ्यांना रु.१००० प्रति क्विंटल अर्थसहाय्य देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक: सपस-२०१८/प्र.क्र.१६९/२४- स**
मंत्रालय, विस्तार, मुंबई-३२
दिनांक:- १९ जून, २०१८.

संदर्भ :- (१) दिनांक ०५/०६/२०१८ रोजीच्या राज्य मंत्रिमंडळ बैठकीतील निर्णय
(२) शासन ज्ञापन, वित्त विभाग क्रमांक:-आकनि २०१८/प्र.क्र.६/अर्थ १३, दिनांक ८ जून, २०१८
(३) शासन ज्ञापन, वित्त विभाग क्रमांक:-शाहमी-२०१८/सपववि/प्र.क्र.४६/अर्थबळ, दिनांक १५ जून, २०१८

**प्रस्तावना :-**

हंगाम २०१७-१८ साठी राज्यात किमान आधारभूत किंमत योजनंतर्गत Price Support Scheme मध्ये तूर व हरभरा खरेदीसाठी नाफेडने राज्य नोडल एजन्सी म्हणून पणन महासंघ व विदर्भ पणन महासंघाची नियुक्ती केली होती. चालू वर्षी प्रथमच तूर व हरभरा (चना) खरेदीसाठी शेतकऱ्यांनी NeMLपोर्टलवर नोंदणी करणे अनिवार्य केले होते. NeML Portal वरुन उपलब्ध माहितीप्रमाणे नाफेडने दिलेल्या उद्दीष्टांचे अधीन राहून, दिनांक १५/५/२०१८ पर्यंत झालेली तूर खरेदी व दिनांक ११/६/२०१८पर्यंत हरभरा (चना) ची झालेली एकूण खरेदी खालीलप्रमाणे आहे:-

| पिकाचा प्रकार | झालेली खरेदी | लाभार्थी शेतकरी | एकूण खरेदी किंमत |
|---|---|---|---|
| तूर | ३३,६७,१७७.४८ | २,६५,८५४ | रु. १८३५.११ कोटी |
| हरभरा(चना) | १३,६९,१८४.४६ | ९९,१६१ | रु. ६०२.४४ |

गतवर्षीच्या हंगामात तूरीची मोठ्या प्रमाणात झालेल्या खरेदीमुळे राज्यातील गोदामे पूर्णपणे भरलेली असल्याने राज्यातील तूर खरेदी व हरभरा खरेदी अत्यंत धीम्या गतीने सुरु होती. राज्य वखार महामंडळाने राज्यातील महामंडळाव्यतिरिक्त अन्य १८३ गोदामे भाडेतत्वावर घेतली आहेत. तथापि,सदर साठवणूक सुविधा अत्यंत अपुरी आहे. सध्या राज्यात मान्सूनपूर्व पाऊस सुरु आहे. तसेच जूनच्या दुसऱ्या आठवडयात मान्सूनचे आगमन अपेक्षित आहे. राज्यात खरेदी केलेली तूर व हरभरा साठवणूकीसाठी जागा उपलब्ध नसल्याने, नोंदणी केलेल्या शेतकऱ्यांची तूर व हरभरा खरेदी करुन साठवणूकीसाठी मर्यादा आल्या आहेत.

दिनांक १५/५/२०१८ पासून तूरीची खरेदी बंद झाली असून, त्यावेळी १,९२,०७६ शेतकऱ्यांची तूर खरेदी करणे शिल्लक आहे. तसेच दिनांक १३/६/२०१८ पासून हरभऱ्याची खरेदी बंद झाली असून, उर्वरित २,१८,६०८ शेतकऱ्यांची तूर खरेदी करणे शिल्लक आहे.

पुरेशा प्रमाणात गोदामे उपलब्ध नसल्याने अपेक्षित प्रमाणात तूर/हरभऱ्याची न झालेली खरेदी, राज्यातील मान्सूनचे आगमन आणि शेतकऱ्यांकडून होणारी अर्थसहाय्याची मागणी विचारात घेऊन हंगाम २०१७-१८ मध्ये किमान आधारभूत किंमत योजनेंतर्गत NeML पोर्टलवर नोंदणी केलेल्या शेतकऱ्यांना रु. १०००/-प्रति क्विंटल अर्थसहाय्य देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

या संदर्भात मंत्रिमंडळातील बैठकीतील चर्चा व निर्देश लक्षात घेऊन सदर योजनेसाठी पुढीलप्रमाणे कार्यवाही निश्चित करण्यात येत आहे:-

a. हंगाम २०१७-१८ मध्ये किमान आधारभूत किंमत योजनेंतर्गत NeML पोर्टलवर नोंदणी केलेल्या, परंतु ज्यांच्याकडून तूर खरेदी केलेली नाही, अशा शेतकऱ्यांना अनुदान देण्यासाठी १० क्विंटल प्रति हेक्टर ही मर्यादा निश्चित करण्यात यावी.

b. तसेच अर्थसहाय्य देण्याकरिता NeML पोर्टलवर लागवडीखालील क्षेत्राच्या नोंदीप्रमाणे परंतु जास्तीत जास्त २ हेक्टर प्रति शेतकरी या मर्यादेत अनुदान निश्चित करण्यात यावे.

c. ज्या शेतकऱ्यांना विहित मुदतीत SMS पाठविण्यात आला होता आणि त्यांनी पूर्वी किमान एकवेळ तूर खरेदी केंद्रावर आणून विकलेली आहे. त्याचबरोबर SMS पाठविला असतानाही कोणतेही ठोस कारण नसतानाही ज्या शेतकऱ्यांनी खरेदी केंद्रावर तूर आणली नाही, अशा शेतकऱ्यांना अपात्र ठरविण्याचा यावे.

d. NeML पोर्टलवर नोंदणी केलेल्या शेतकऱ्यांना खरेदी केंद्रावर तूर आणण्यासाठी विहित मुदतीत SMS पाठविता आला नाही, अशा शेतकऱ्यांना अर्थसहाय्यासाठी पात्र ठरविण्यात यावे.

e. NeML पोर्टलवर ज्या शेतकऱ्याच्या लागवडीखालील क्षेत्राची चूकीची नोंद करण्यात आली आहे अशा प्रकरणी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मुंबई यांनी योग्य ती कार्यपध्दती अवलंबून तूरीच्या पिकाखालील क्षेत्र बरोबर असल्याची खातरजमा करुन शेतकऱ्यांच्या आधार कार्डाशी जोडलेल्या बँक खात्यात अनुदान वितरीत करण्यात यावे.

f. अनुदानाचे वितरण NeMLपोर्टलवर नोंदणी असलेल्या शेतकऱ्यांना पोर्टलद्वारेच त्यांच्या आधार जोडणी असलेल्या बँक खात्यात करण्यात यावे.

g. निधी वितरणाची संपूर्ण जबाबदारी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ यांची राहील.

२. या योजनेंतर्गत सुरुवातीस होणारा खर्च नमूद लेखाशिर्षाखाली उपलब्ध करुन देण्यात आलेल्या रुपये ७० कोटी आकस्मिकता निधीतून भागविण्यात यावा:-

मागणी क्रमांक व्ही-२
२४२५ सहकार
००
१९५-सहकारी संस्थांना सहाय्य
(०१) सहकारी पत संस्थांना सहाय्य
(०१)(०४) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघामार्फत शेतमालाची खरेदी करण्यासाठी लागलेल्या अनुषंगिक खर्चाची रक्कम अदा करण्याकरिता अर्थसहाय्य
(अनिवार्य) (२४२५ २५४२)
३३ अर्थसहाय्य

३. तसेच उर्वरित अर्थसहाय्य वितरित करण्यासाठी, वित्त विभागाच्या शासन निर्णय, दिनांक १५/०६/२०१८ अन्वये मंजूर केलेल्या रुपये ४८० कोटी शासन हमीच्या आधारे पणन महासंघाने राष्ट्रीयीकृत बँकाकडून कर्ज उपलब्ध करुन घ्यावे.

४. शासन हमीद्वारे उभा करण्यात आलेले कर्ज व त्यावरील व्याजाची रक्कम राज्यशासनाकडून अदा करण्यात येईल.

५. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनौसं-३६९/२०१८/व्यय-२, दिनांक १९/६/२०१८ याव्दारे दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१९१८०८०४९६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Ghadyale Sunanda Mohanrao

Digitally signed by Ghadyale Sunanda Mohanrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation, Marketing and Textiles, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd89208cbc27b202c96467165ac5bc9643515d80ba9ed ecaf650dad6e8311b45, cn=Ghadyale Sunanda Mohanrao
Date: 2018.06.19 18:13:09 +05'30'

**( सुनंदा मो. घड्याळे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

I. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबारहिल, मुंबई
II. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
III. मा. मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) मंत्रालय, मुंबई
IV. मा. मंत्री (अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण) मंत्रालय, मुंबई
V. मा. सर्व मंत्री व राज्य मंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

VI. मा. राज्यमंत्री ( पणन ) यांचे मंत्रालय, मुंबई
VII. मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
VIII. मा.अ.मु.स. ( वित्त ) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
IX. प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
X. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या. मुंबई,
XI. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ.पुणे
XII. सर्व जिल्हाधिकारी,
XIII. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
XIV. कार्यकारी संचालक,महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ, पुणे
XV. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था
XVI. सर्व जिल्हा मार्केटिंग अधिकारी, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.
XVII. सर्व सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था
XVIII. महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ), मुंबई/नागपूर,
XIX. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
XX. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-११, मंत्रालय, मुंबई-३२
XXI. अवर सचिव, १७ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
XXII. निवड नस्ती २४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.